**सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी “सिंचन विहीरींचा धडक कार्यक्रम” योजनेकरिता निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांचेकडे वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विहिर-२०१६/प्र.क्र.३१/रोहयो-५.**

१६ वा मजला, नविन प्रशासकीय भवन, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८ नोव्हेंबर, २०१६

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः नियोजन विभाग, क्रमांक -विहिर-२०१६/प्र.क्र.३१/रोहयो-५, दिनांक ११ सप्टेंबर, २०१६.

२) शासन निर्णय क्रमांकः महसूल व वन विभाग क्रमांक : एससीवाय-१०/२०१६/प्र.क्र.८०/म-११, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१६.

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक १ वरील शासन निर्णयान्वये नागपूर विभागातील गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया व नागपूर या पाच जिल्हयांत सिंचन विहिरींचा धडक कार्यक्रम घेण्याचे तसेच सदर कार्यक्रमासाठी लागणारा निधी योजनेतर Drought Mitigation Measures अंतर्गत मदत व पुनर्वसन विभागामार्फत उपलब्ध करुन देण्याचे निर्देश देण्यात आले होते.

त्यास अनुसरुन रोजगार हमी योजने अंतर्गत नागपूर विभागातील गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया व नागपूर या पाच जिल्हयांना एकूण ११,००० विहीरींचा लक्षांक देऊन विहिरी पूर्ण करणेसाठी Drought Mitigation Measures अंतर्गत महसूल व वन विभागाकडून (मदत व पुनर्वसन) अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या योजनेतर योजनेखालील रु.७५० कोटी पैकी रु.२७५ कोटी निधी सिंचन विहीरी तयार करणेसाठी रोहयो प्रभागास उपलब्ध करुन देण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यानुसार महसूल व वन विभागाने त्यांच्या दिनांक १६ नोव्हेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये रू. २७५.०० कोटी निधी या विभागास उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये “ सिंचन विहिरींचा धडक कार्यक्रम ” ही योजना कार्यान्वयीत करण्याकरिता ज्या लाभार्थ्यांचे अर्ज शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करीत आहेत किंवा पात्र ठरले आहेत, त्यांना निधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. महसूल व वन विभागाने रुपये २७५.०० कोटी निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे. सदर रुपये २७५.०० कोटी निधी या

शासन निर्णयान्वये विभागीय आयुक्त, नागपूर यांना मंजूर करुन अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०१६-१७ या चालू वित्तीय वर्षात मागणी क्रमांक सी-९-४२५०, इतर सामाजिक सेवांवरील भांडवली खर्च, १०१ (००)(००)(०२) दुष्काळ प्रतिबंधक उपाययोजना या अंतर्गत "विहीरी तयार करणे" (४२५० ए ०१६) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या उपलेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात आलेल्या अनुदानामधून रू.२७५.००कोटी (अक्षरी रूपये दोनशे पंच्याहत्तर कोटी फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांचेकडे वितरीत करण्यात येत आहे. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सदर खर्च वर नमूद केलेल्या लेखाशिर्षामधून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकावा. तसेच मंजूर अनुदान रु.२७५ कोटीच्या ४% इतका निधी प्रशासकीय खर्च म्हणून कोषागारातून आहरीत करुन तो संदर्भाधीन अनुक्रमांक १ मधील शासन निर्णयात दिलेल्या निर्देशानुसार वितरीत करावा.

३. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सदर निधीपैकी किती निधी, कोणत्या उपाययोजनांवर किती खर्च करण्यात आला आहे / करण्यात येणार आहे, याबाबतची जिल्हानिहाय आणि उपाय योजनानिहाय माहिती पुढील निधीची मागणी करताना सादर करणे अनिवार्य राहील तसेच त्रुटीपूर्ण मागणी विचारात घेतली जाणार नाही याची नोंद घ्यावी.

४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची विभागीय आयुक्त, नागपूर यांनी खातरजमा करावी. तसेच हा निधी अन्य उपाय योजनांसाठी व बाबींवर खर्च होणार नाही, याचीही विभागीय आयुक्त, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.

५. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, याबाबतची जिल्हानिहाय प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त, नागपूर यांनी या विभागाकडे दर पंधरा दिवसांनी खर्चाच्या अहवाला सोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख / नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. त्याचप्रमाणे दर पंधरा दिवसांनी होणा-या प्रत्यक्ष खर्चाचे पत्रक अशा २ पंधरवडयाचे एकत्रित खर्चाचे पत्रक पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या न चुकता

सादर करावीत. दरमहा झालेल्या खर्चाची, महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करून त्याबाबतचे प्रमाणपत्र तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता नियंत्रण अधिका-यांनी घ्यावी.

६. नियंत्रक अधिका-यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (रोहयो) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उपकोषागार यांसकडे पाठविण्यात येणा-या बिलासोबत जोडल्या जाणा-या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण उपशिर्षाच्या / “संगणक” संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा असे आदेश कृपया संबंधित अधिका-यांना नियंत्रण अधिका-यांनी द्यावेत. कोषागारातून / उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

७. विभागीय आयुक्त नागपूर यांनी उपरोक्त निधीचे हिशेब स्वतंत्ररित्या ठेवावेत. तसेच जानेवारी २०१७ पर्यंतच्या कार्यक्रमाची रुपरेषा आखून तसा आराखडा रोजगार हमी योजना विभागास दिनांक ३१.१२.२०१६ पर्यंत सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१३०४१३८५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Pramod Sopan Shinde

Digitally signed by Pramod Sopan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=State Cordinator SBM-G, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pramod Sopan Shinde
Date: 2016.11.21 11:22:23 +05'30'

**( डॉ. प्रमोद शिंदे )**
सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन

प्रत,
१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव

४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.समिती प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मुख्य सचिव यांचे सहसचिव
७. सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१२.मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
१३.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१६.सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
१७.सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे /सर्व अधीक्षक अभियंता,लघु पाटबंधारे, (स्थानिक स्तर)
१८. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई,/महासंचालक, माहिती व जनसंपर्क,मुंबई (प्रसिध्दीकरीता),
१९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
२०. सर्व उपायुक्त (विकास)
२१.महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२२.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४.सर्व उपसचिव/सर्व अवर सचिव व सर्व कार्यासन अधिकारी, रोहयो व सर्व मंत्रालयीन विभाग,
२५.निवडनस्ती रोहयो-५